सोलापूर महानगरपालिकेच्या दिनांक १९.०७.२००८ रोजीच्या सर्वसाधारण सभेतील ठराव क्रमांक १२४ अंशत: निलंबित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सोमपा-२०१८/प्र.क्र.६६७/नवि-१८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२.०२.२०२२

**संदर्भ** :- १) सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारणसभा ठराव क्र. १२४, दि. १९.०७.२००८
२) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.एसीटी-९/५४४, दि.२६.१०.२०१७
३) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.एसीटी-९, दि.२५.०७.२०१९

**प्रस्तावना :-**

सोलापूर शहरातील गलिच्छ वस्ती निर्मूलन योजनेअंतर्गत रविवार पेठ भागामध्ये बांधण्यात आलेले २५६ गाळे सन १९७६-७७ च्या कालावधीत झोपडपट्टी धारकांना नाममात्र दराने पाणीपट्टी आकारण्याच्या रक्कमेसह भाडेपट्याने प्रतिमहा रु. २८ दराने देण्यात आले होते. सदरच्या गाळ्याकरीता एक वर्षाचे करार करण्यात आल्याचे दिसते. महानगरपालिकेने १९८६ पासून सदर गाळेधारकांकडून मालमत्ता कर व या गाळ्यातील रहिवाशांकरीता इतर रहिवाशांप्रमाणे रु.२,७५६/- पाणीपट्टी कर आकारण्यास सुरूवात केली. सदरच्या आदेशास शासनाने पत्र क्र.सोनपा-१८०८/६२२/प्र.क्र.११४/०८/नवि-२५, दि.२९.०३.२००८ अन्वये स्थगिती दिली. दरम्यानच्या कालावधीत महानगरपालिकेने दि.१९.०७.२००८ रोजी ठराव क्र. १२४ पारीत करुन विना परवानगी हस्तांतरीत झालेल्या गाळे धारकांकडून रु. ५०००/- इतकी रक्कम आकारुन हस्तांतरण नियमित करण्याचा तसेच सर्व गाळेधारकाना थकीत टॅक्समध्ये ५० टक्के सुट देण्याचा निर्णय घेतला. सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ (१) मधील तरतुदीनुसार महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरुध्द असल्याने सदर ठराव विखंडीत करणे आवश्यक ठरते, असे शासनाचे मत झाले आहे. तसेच येथील गाळेधारक हे पुर्वीचे झोपडपट्टीधारक असल्याने त्यांनादेखील दिलासा मिळावा यासाठी प्रकरणी सुवर्णमध्य काढून निर्णय घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

सोलापूर महानगरपालिकेने शहरातील रविवार पेठ येथील २५६ गाळेधारकांकडून सन १९८६ पासून मालमत्ता कर व इतर रहिवाशांप्रमाणे प्रतिवर्षी रु. २,७५६/- पाणीपट्टी आकारण्यास सुरूवात केली होती. या कार्यवाहीस शासन पत्र क्र. सोनपा-१८०८/६२२/प्र.क्र.११४/०८/नवि-२५, दि.२९.०३.२००८ अन्वये देण्यात आलेली स्थगिती उठविण्यात येत आहे.

२. सोलापूर महानगरपालिकेने सर्वसाधारण सभा ठराव क्र. १२४ दि.१९.०७.२००८ अन्वये, विना परवानगी हस्तांतरीत केलेल्या गाळेधारकांना रु. ५०००/- इतकी रक्कम आकारुन भाडेपट्टा नियमित करण्यास मंजूरी दिली आहे. ही बाब कायम ठेवण्यात येत असून ती विखंडीत न करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. उपरोक्त ठराव क्र. १२४ दि.१९.०७.२००८ मधील मंजूरीनुसार सदरच्या गाळेधारकांकडून सन १९८६ पासून वसूल करण्यात येणारी पाणीपट्टीची थकीत रक्कम भरण्यास ५० टक्के सूट देण्याचा महानगरपालिका सर्वसाधारण सभेने निर्णय घेतला आहे. यामध्ये अंशत: बदल करुन सदरच्या गाळेधारकाकडून सन १९८६ पासून उपरोक्त ठरावाच्या दिनांकापर्यंत (म्हणजे दि.१९.०७.२००८ पर्यंत, मार्च, २००८ अखेरची) प्रलंबित असलेली नळ आकारणी / पाणीपट्टीची रक्कम यामध्ये ५० टक्के सूट देण्याचा तसेच सन २००८ - २००९ पासून नळ आकारणी / पाणीपट्टीची रक्कम प्रतिवर्षी रु. २,७५६/- आकारण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

४. सोलापूर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेतील दिनांक १९.०७.२००८ रोजी पारित केलेला ठराव क्रमांक १२४ मधील मंजूर केलेली बाब महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ (१) मधील तरतुदींशी आर्थिकदृष्ट्या विसंगत ठरत असल्याने त्यामध्ये वरीलप्रमाणे अंशत: बदल करुन तो विखंडीत करण्याच्या हेतुने कलम ४५१ (१) अन्वये प्रथमत: सदरचा ठराव अंशत: निलंबित करण्यात येत आहे. त्यानुसार याप्रकरणी संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत सदर अभिवेदन सादर करण्याची संधी देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२२१४४१४७२५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS NATHA DHAIJE

Digitally signed by VILAS NATHA DHAIJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cbfac8a74f547d6db7c665bc59a04c3d5f9e582a842e3ae0aac1309f797f88a, serialNumber=9b34e2dd1552c4209100df5fb96a2cdcb5ce5ac0a7e1df80a5aa7ed2f6e611a5, cn=VILAS NATHA DHAIJE
Date: 2022.02.22 15:57:14 +05'30'

**( वि. ना. धाईजे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महापौर, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर

२) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर

यांना विनंती करण्यात येते की, सदर आदेशाची प्रत संबंधित गाळेधारकांच्या निदर्शनास आणण्यात यावी, तसेच त्यांना सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या कालावधीत शासनाकडे अभिवेदन करावयाचे असल्यास ते करता येईल, ही बाब अवलोकीत करण्यात यावी.

३) नगर सचिव, सोलापूर महानगरपालिका

४) मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) निवड नस्ती (नवि-१८), नगर विकास विभाग.